**मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालयातील कक्ष अधिकारी संवर्गातील १ पद तात्पुरत्या स्वरुपात सहायक संचालक (लेखा) पदात श्रेणी उन्नत व रुपांतरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२९२४/प्र.क्र.२९/आस्था-२(१९अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ एप्रिल, २०२४

**वाचा :**

(१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : आढावा १८१९/प्र.क्र.१७/१९-अ दिनांक १४ ऑगस्ट, २०१९.

(२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक :आढावा-१६१६/प्र.क्र.२१३/१९-अ दिनांक १७ जानेवारी, २०२३.

**प्रस्तावना :**

सन २०२४ मध्ये होणाऱ्या लोकसभा व विधानसभा सार्वत्रिक निवडणूकांच्या पार्श्वभूमीवर सामान्य प्रशासन विभागांतर्गत मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य कार्यालयातील कक्ष अधिकारी संवर्गातील १ पद सहायक संचालक (लेखा) पदात तात्पुरत्या स्वरुपात श्रेणी उन्नत व रुपांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सार्वत्रिक निवडणूक -२०२४ च्या पार्श्वभूमीवर निवडणूकांशी संबंधित विविध बाबींवरील खर्च, मंजूरी व अनुदान याबाबींचा ताळमेळ योग्यप्रकारे ठेवण्याच्यादृष्टीने लेखाधिकारी यांच्या सेवेची आवश्यकता आहे. मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालयातील कक्ष अधिकारी (वेतनस्तर एस-१७ : रु.४७६००-१५११००) संवर्गातील १ पद सहायक संचालक (लेखा) (वेतनस्तर एस-२० : रु.५६१००-१७७५००) या पदामध्ये दिनांक १५ मार्च,२०२४ पासून दिनांक ३१ डिसेंबर,२०२४ पर्यंत तात्पुरत्या स्वरुपात श्रेणी उन्नत व रुपांतरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. दिनांक ०१ जानेवारी,२०२५ पासून सदर पद मूळ पदामध्ये रुपांतरीत होईल.

२. याबाबत होणारा खर्च सामान्य प्रशासन विभागाच्या संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. १४१/सेवा-९, दि. १५.०३.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०२४०४१६१२१५५८१५०७ हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KASHINATH SHINDE

Digitally signed by KIRAN KASHINATH SHINDE
DN: CN = KIRAN KASHINATH SHINDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2024.04.16 12:29:30 +05'30'

**( कि. का. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मुख्यमंत्री यांचे अतिरिक्त मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. अवर सचिव (रोखशा / कार्या-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सहायक संचालक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यासन :निवडणूक (कार्या ३३)/ आस्था-१(कार्या १९) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती / कार्यासन- आस्था-२(१९अ).